सूत्राणि.

**अव्यवायाच्च ॥ ३१ ॥ (यु० ) ॥**

**भावार्थः** । अनया रीत्या व्यवधानं न भवेत् । व्यवधानं नाम क्रमभेदः । क्रमभेदे दोष आम्नातः ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

अप वा एतत् यज्ञाच्छिद्यते । यदन्यस्य तंत्रे विततेऽन्यस्य तंत्रं प्रतीयते ॥

**असंबंधात् तु नोत्कर्षेत् ॥ ३२ ॥ ( सि० ) ॥**

**भावार्थः** । यत् पूर्वपक्षकारेणोक्तं तन् न । अग्निहोत्रस्योत्कर्षो न करणीयः । स्वकाले तदनुष्ठेयं । प्रचरत्यां सांतपनीयेष्टौ मध्येऽग्निहोत्रमनुष्ठेय । तेन क्रमभंगो न भवेत् । किं कारण । क्रमविधायकं शास्त्रं नास्ति । न चाऽग्निहोत्रस्य सांतपनीयया सह कोपि संबंधः ॥

गेले असे झाले असता चिंता नाही; तसेच अग्निहोत्राचा वेळ पुढे गेला असता चिंता नाही म्हणजे अग्निहोत्राचा उत्कर्ष करावा. असा उत्कर्ष न केला असता आणि अग्निहोत्र पुढे न केले असता, सांतपनीया-इष्टि यथासांग होणार नाही या संबंधी जें वेदवाक्य आले आहे त्याचे भाषांतर एणेप्रमाणे " सांतपन मरुत देवाकरता चरूचा निर्वाप करतो. "

fice is always performed at noon, and in the evening of the same day the Agnihotra is performed When the Sântapanîyâ sacrifice, instead of being performed at noon, is performed in the evening, then two sacrifices are to be performed in the evening—the Sântapanîyâ and Agnihotra As the time of Sântapanîyâ is changed, so the time of Agnihotra must be changed This is the position of the Bouddhâcharya, and he illustrates it in the following way. The Soma-juice, which is extracted in the morning and is then offered, forms the morning-libation Being extracted and offered at noon, it forms the noon-libation On account of some obstacle the morning-libation is offered late, then necessarily the noon-libation cannot be offered at noon, it must be made later, and there is no

३१ पुन, कारण क्रम चुकत नाहीं (पु०)

३२ तसें नव्हे, उत्कर्ष करूं नये, कारण संबंध नाहीं (सि०)

३१ सांतपनीया इष्टि पुरी झाल्या नंतर अग्निहोत्र करावें अग्निहोत्राची वेळ टळली तरी चिंता नाहीं अशी आम्ही व्यवस्था केली आहे त्या व्यवस्थेच्या योगानें क्रमभंग होत नाहीं आणि क्रमभंग जर केला तर दोष आहे म्हणून आम्ही केलेली व्यवस्था स्वीकारावी या संबंधीं जें वचन आहे त्याचें भाषांतर एणेंप्रमाणें "एक यज्ञ चालले असतां त्यामध्यें जर दुसरा प्रारंभ आला तर त्याचा यज्ञभंग होतो"

३२ अग्निहोत्र संध्याकाळीं करावें पुढें ढकलूं नये सांतपनीया इष्टि समाप्त झाली नाहीं ती करतां करतां संध्याकाळ झाली तर मध्यें अग्निहोत्र करून घ्यावें पुढें सांतपनीया-इष्टि चालवावी असें केल्यानें क्रमभंग होत नाहीं का? क्रमाचें विधान करणारें शास्त्र नाहीं आणि अग्निहोत्राचा आणि सांतपनीया-इष्टीचा कांहीं संबंध नाहीं

31 Again, because sequence is not set aside (Argument)

32 Not so, no forward transference can be made because there is no connection (Final statement)

objection to this. In like manner instead of being performed at the proper time the Agnihotra may be performed later, that is the Agnihotra may be transferred forwards. If such a transference be not made and if the Agnihotra be performed at its proper time then the Santapaniya small sacrifice cannot be adequately performed. The following is the translation of the Vedic text on the subject. He consecrates boiled rice to be offered to destructive winds (Santapana maruta)

31 The Agnihotra is to be performed after the completion of the Santapaniya sacrifice. It does not matter if the Agnihotra is not performed at its proper time. The adjustment I have thus made does not involve the violation of any of the principles of sequence —*a violation which is always to be condemned*. The consequence is that the adjustment I have proposed must be accepted. The following is the translation of the Vedic text quoted. If a sacrifice be performed in the course of another sacrifice this sacrifice is violated

32 The Agnihotra must be performed in the evening and not later. If the Santapaniya small sacrifice be not finished till the evening in the course of its performance the Agnihotra must be performed. This being finished,

सूत्राणि.

**प्रापणाच्च निमित्तस्य ॥ ३३ ॥ ( यु० ) ॥**

**भावार्थः** । वेदे निमित्तं विहित । तेनाऽग्निहोत्रकालातिक्रमणं न सभवति ॥

अनुसंधेयानि वेदवाक्यानि ॥

यदनुदिते सूर्ये प्रातर्जुहुयात् । + उदिते सूर्ये प्रातर्जुहोति । + + + सायं जुहोति । तै० ब्रा० ( २.१,२,७. ) ॥ प्रथमास्तमिते जुहोति ॥ सधौ जुहोति ॥ नक्षत्राणि दृष्ट्वा जुहोति ॥

**संबंधात् सवनोत्कर्षः ॥ ३४ ॥ ( आ० नि० ) ॥**

**भावार्थः** । साम्यं दृष्टांतस्य बीजं । प्रातःसवनमाध्यंदिनसवनयोः सबधो वर्तते । सांतपनीयाऽग्निहोत्रयोस्तु कश्चित् सबंधो नाऽस्ति । तेन सवनस्योत्कर्षः । न त्वग्निहोत्रस्य ।

## उक्थ्याऽनुरोधेन षोडश्युत्कर्षाऽधिकरणम् ॥

**षोडशी चोक्थ्यसंयोगात् ॥ ३५ ॥**

**भावार्थः** । उक्थ्यसबंधात् षोडशी ग्रह उत्कृष्टव्यः । तत्र शास्त्रार्थः। ज्योतिष्टोमे उक्थ्यग्रहास्त्रयो गृह्यंते । पश्चात् षोडशी ग्रहः । कस्माच्चित् प्रतिबंधादुक्थ्यग्रहाणामासायमनुष्ठानं न समाप्येत चेत् ततः पश्चात् षोडशी ग्रहोऽनुष्ठेयः। तेनोक्थ्यग्रहाणां मध्ये षोडशी ग्रहो न क्रियते । यद्यपि द्वात्रिंशसूत्रसिद्धांतेन मध्येऽनुष्ठानं प्राप्नोति तथापि श्रुतिप्रमाणेन तस्य बाधः ॥

अनुसधेयानि वेदवाक्यानि ॥

तं परांचमुक्थेभ्यो विगृह्णाति ॥ संमयाविषिते सूर्ये षोडशिनः स्तोत्रमुपाकरोति । तै० स० ( ६.६,११,६. ) ॥

**इति पंचमाऽध्यायस्य प्रथमः पादः ॥**

ताच यावयाचा नाही. प्रात सवन आणि माध्यंदिन सवन यामध्ये साम्य आहे. सातपनीय इष्टि आणि अग्निहोत्र यामध्ये काही साम्य नाही म्हणून माध्यंदिन सवनाचा वेळ चुकला असता ते पुढे करावे परंतु अग्निहोत्राचा वेळ चुकू नये, ते संध्याकाळचे संध्याकाळीच केले पाहिजे. म्हणून अग्निहोत्राचा उत्कर्ष होत नाही, सवनाचा उत्कर्ष होतो म्हणून बौद्धाचार्यांनी जो दृष्टांत दिला आहे तो असयुक्तिक आहे.

३५ सूत्रार्थ करण्यापूर्वी थोडा शास्त्रार्थाचा विचार केला पाहिजे ज्योतिष्टोम यज्ञ करताना उक्थ्य नावाने सोमरसाचे तीन पेले घ्यावे लागतात. पुढे षोडशी नावाचा सोमरसाचा पेला घ्यावयाचा काही एक प्रतिबंध आला आणि संध्याकाळपर्यंत उक्थ्य नावाच्या पेल्यात सोमरस घेऊन ते हवन पुरे झाले नाही तर ते हवन पुरे करून पुढे षोडशी नावाचा ग्रह घ्यावा. उक्थ्य नावाच्या ग्रहातून हवन करता करता मध्ये षोडशी नावाचा ग्रह घेऊ नये कारण याविषयी श्रुतिप्रमाण आहे. म्हणून बत्तिसाव्या सूत्री केलेला सिद्धांत एकीकडे राहतो यासंबधी जी वेदवाक्ये आली आहेत त्याचे भाषांतर एणेप्रमाणे "उक्थ्य झाल्यानंतर तो (पेला) तो घेतो" "अर्धा सूर्य मावळल्यावर षोडशी नावाचे स्तोत्र म्हणतो"

34. A resemblance is the essence of an illustration. There can be no analogy without resemblance. Between the morning and midday libations there is much that is common, but because there is no analogy whatever between the Agnihotra sacrifice and the Sântapaniyâ sacrifice, the midday libation can be performed later when it is not performed at noon. But the time of the Agnihotra cannot be changed; it must be performed in the evening. While there cannot be forward transference of the Agnihotra-sacrifice, a libation can be so transferred. The analogy, therefore, which the Bouddhâchârya brings forward, is not well-founded.

35. It is necessary to describe the sacrificial procedure before the sutra is explained. Three cups of the Soma juice called Ukthya are to be taken, and oblations from them are to be made in a Jyotistoma-sacrifice. Then follows the oblation from a cup of the Soma-juice called *Sodashi*. Say on account of some difficulty, oblations from the cup called Ukthya are not completed till the evening. Then under these circumstances the Ukthya-libations should be finished, and then the cup called *Sodashi* should be taken up. The *Sodashi* cannot come into the midst of the Ukthya-libation, because there is a direct statement on the subject, and the proposition laid down in the thirty-second sûtra is, therefore, to be set aside. The following is the translation of the Vedic texts quoted. "After the Ukthya-cup he takes up that cup" "After the sun is half set, he begins a song called *Sodashi*"

## उपसंहार•

इतिहासदृष्ट्या आणि शास्त्रदृष्ट्या विचार करण्याजोग्या गोष्टी या पादांत आल्या आहेत. क्रम म्हणजे काय त्याच्या जाती किती, आणि त्यांचं लक्षण काय याविषयीं उपपादन या भागांत करून आहे. क्रमाशीं उत्कर्ष आणि अपकर्ष याचा संबंध असल्यामुळे त्याचाहि विचार झाला आहे. याविषयीं जे सिद्धांत त्यांचे निरूपण करतांना यज्ञकर्मांतील उदाहरणे घेतलीं आहेत म्हणून ऐतिहासिक विषयहि आले आहेत. प्रथम ऐतिहासिक विषयाचा विचार करून मीमांसाशास्त्राचा विचार करूं म्हणजे सिद्धांत समजण्यास सुलभ पडेल. चातुर्मास्य म्हणजे काय? या इष्टी आहेत. या विकृति आहेत. प्रथम चार चार महिन्यांनी या करावयाची परिपाटी असावी, परंतु पुढें ही परिपाटी बदलून पांच किंवा बारा दिवसांमध्यें प्राचीन आर्य या इष्टी पुरी करूं लागले. प्रथम प्रकृति आणि मग विकृति म्हणून दर्शपूर्णमास इष्टीच्या मागून या चातुर्मास इष्टी उत्पन्न झाल्या असाव्या. यामध्यें चार भाग मुख्य आहेत. त्यांची नांवें वैश्वदेव, वरुणप्रघास, साकमेध आणि शुनासीरीय. वैश्वदेव पर्वाच्या पूर्वी वैश्वानर पर्जन्य इष्टि करावी लागे. वैश्वानर अग्नि यानें आम्हांपासून नवी मती किंवा स्तोत्र उत्पन्न केलें (तो) पृथ्वीच्या आणि तेजाच्या योगानें वाढत वा

## SUMMARY

There are some things in this Chapter which deserve to be examined from historical and philosophical points of view. What is sequence? What are its different kinds? What are their definitions? What is the relationship between sequence on one hand and backward and forward transference on the other? All this is expounded in this chapter. And in the course of this exposition illustrations are given from the sacrificial procedure, and thus historical questions are involved. We will take the last first so that philosophical questions discussed may be easily understood. The Chaturmasya is a series of small modified sacrifices. In the remote ancient times these sacrifices seem to have been performed at the interval of every four months. But this was early changed and they finished the Chaturmasya-sacrifices in five or twelve days. As a model sacrifice must precede the modified sacrifices in point of time the new and the full moon sacrifices must be more ancient than the Chaturmasya-sacrificial-system which consists of four parts. Their names are—Vaishvadeva, Varuna-praghasa, Saka-medha and Shunasiriya. Before the part called Vaishvadeva a sacrifice for securing rain and called Vaishvanara is performed. The following Vedic text is met with in a Shrouta-sûtra "Agni called Vaishvanara has produced from us new intelligence (prayer) or a song. He goes on growing by

ढत जाणारा." (हा मंत्र सूत्रात अढळतो) "द्युलोकामध्ये वास करणारा आणि पृथ्वीमध्ये वास करणारा असा अग्नि सर्व ओषधीमध्ये शिरला तेजाने युक्त असा वैश्वानर अग्नि तो रात्रदिवस शत्रूपासून आम्हास तारो" (ऋ० सं० १ ९८, २) "सेचन करणारा द्युलोकाचा पुत्र, जो पर्जन्य त्याचे स्तवन करा (हो). तो आम्हाला नवे यवसादि धान्य देवो" (ऋ० सं० ७ १०२, १) "वारा खूप सुटतो, विजा चमकायाला लागतात, झाडे हलायाला लागतात, आभाळ निघते, सर्व सृष्टीच्या हिताकरता अन्न उत्पन्न होतें, किंवा पृथ्वी सर्व सृष्टीचे हित करण्याला सिद्ध होते तेव्हा पर्जन्य उदकाच्या योगाने पृथ्वीचे रक्षण करतो" (ऋ० सं० ५. ८३, ४) या मंत्रावरून ही इष्टि पाऊस पडायाला सुरवात होण्याच्या पूर्वी करण्याचा संप्रदाय असावा दर्श किंवा पूर्णमास ही प्राचीन इष्टि आहे चातुर्मास्य ह्या इष्ट्या ब्रह्मवाद्यांच्या वेळी प्रबळ झाल्या कण्व, गोतम, अशी निरनिराळी आर्यकुळे सरस्वतीच्या तीरी वास करू लागली होती सुख-संपत्ति पूर्ण असल्यामुळे वास्तविक जे व्यवहार त्यास करावे लागत ते यज्ञद्वारा मात्र करीत हे दृष्टांत दिला असता सहज लक्षात येईल

गायकवाडचे पदरचे सरदार काठेवाडावर नेहमी स्वारी करीत आणि तेथील रजपूत सरदाराकडे खंडणी मागत त्याचा याचा युद्धप्रसंग झाल्यावाचून खंडणी देत नसत पुढे होता होता

means of light and the earth Dwelling in the heavens and on the earth, the Agni entered the vegetables May the Vaishvânara Agni, bathed in light, protect us from our enemies night and day" *R*ik sanhitâ (I. 98,2) "Sing the praises of rain, sprinkling (his power), the son of the heavens May he grant us new barley." "A high wind blows, lightnings flash, trees shake, the sky lowers, and for the good of all creation corn is produced, or the earth prepares to do good to the universe, when by means of water rain sustains the earth" *R*ik-sanhitâ (V 83,4) Because these verses are used in this sacrifice called Vaishvânara for securing rain, it is plain that it was performed before the regular rain set in The new or full moon-sacrifice belongs to early antiquity The Châturmâsya-sacrifices predominated during the times of the Brahmavâdins. The tribes led by Goutama and Ka*n*va dwelt on the banks of the Sarasvatî Their opulence led them to concentrate all their energies on sacrifice This cannot be explained without an illustration The barons of the Gaikavad once invaded Kattiawar, and levied contributions from them The chief of Kattiawar never paid any contribution unless a battle or two were fought. In process of time, this became a custom The Gaikawad nominally invaded Kattiawar and its chiefs nominally defied him and really paid the established tribute Such is the origin of a political custom, and similar is the origin of the customs of the ancient Âryas When different

पाप्मा माझा जार असे तो म्हणते. यजमानासहि हे कर्म करताना असें म्हणावे लागते जे पाप आम्ही गावात केले, जे पाप अरण्यात केले, जें पाप सभेमध्ये केले, जे पाप इंद्रियसंबंधाने केले, जे पाप शूद्रसंबंधाने केले, जे पाप वैश्यसंबंधाने केले, जे पाप (नवराबायकोमधील) कोणीएक धर्म आचरीत असता केले, त्याचा नाशक (हे वरुण) तू आहेस तै० सं० (१ ८, ३, १) या स्थळीं हा मंत्र आला आहे. असे म्हणून वरुणास तुपाची आहुति द्यायाची या यज्ञास वरुणप्रघास असें नाव देण्याचे कारण असे आहे की वरुण मनुष्यास आपले पाशात धरतो. त्यापासून आपली सुटका व्हावी म्हणून मनुष्य हा यज्ञ करतो हा यज्ञ झाल्यानंतर चातुर्मास्याच्या संबधाने तिसरे पर्व करावे लागते त्याचे नाव साकमेध याच्या संबधाने सात निरनिराळ्या इष्टी कराव्या लागतात. त्यांची नावे. आनीकवतेष्टि, सांतपनीयेष्टि, गृहमेधीयेष्टि, क्रीडनीयेष्टि, महाहविरिष्टि, महापितृयज्ञ, आणि प्रसिद्धिइष्टि. ह्या साकमेध पर्वाचे स्वरूप काय हे कळण्याकरता इतके सांगितले म्हणजे पुरे की बहुतेक यज्ञ का करावे असे दाखविण्याकरता वेदांत आख्यायिका आल्या आहेत. त्यामध्ये देवासुरांचे युद्ध झाले म्हणून हा यज्ञ उत्पन्न झाला असे वर्णिले आहे यावरून असे सिद्ध होते की अशा प्रकारचे बहुतेक यज्ञ प्राचीन काळी आर्यांनी जी युद्धें केली त्यांची स्मारके आहेत. आनीकव-

committed in town, the sin that I have committed in forest, the sin that I have committed in any assembly, the sin that is connected with my senses, the sin committed by me in relation to Shûdras, the sin committed in relation to Vaishyas, the sin committed in relation to husband and wife, when either of them is performing a duty, oh Varuna, thou art the destroyer of all these (sins)" This text occurs in the Taittiriya-sanhitâ (I 8,3,1) So saying the sacrificer made an offering of clarified butter to the god Varuna This sacrifice is called Varuna-praghâsa, because man may be delivered from the meshes of god Varuna This series of sacrifices is followed by another called Sâkamedha, which comprises seven small sacrifices Their names are—Anîkavatesti, Sântapaniyesti, Griha-medhiyesti, Kridaniyesti, Mahâhavir isti, Mahâpitri-yajna, and Prasiddhi-isti To explain the nature of the Sâkamedha sacrifices, it is enough to state that the origin of the most of the sacrifices is described in the Veda by means of stories, which state that when the Devas and the Asuras fought, the gods instituted a particular sacrifice. The inference from this is that the ancient Âryas commemorated their wars or battles by means of sacrifices The god of the Anîkavata-sacrifice is martial Agni or the Agni of the army It appears to be the custom of the ancient Âryas that they carried their sacred fire with them whenever they moved from one place to another The Sântapaniyesti commemorates that the

तेष्टि म्ह जे संग्रामधील अग्नि त्याची देवता आहे प्राचीन आर्यामध्ये अशी चाल होती कीं युद्ध चा घास किंवा तो ठाईं जा घास त निघाले म्हणजे घरो-घर ते अग्नि घेत दुसर, सांतपनीयष्टि म्ह-णजे सं यांच्या योगान शत्रूत नासधाचन त्यांचा पाडाव करण्यात त्यांचा मोड करून त्याच सर्वस्व आपण हरण करा-याच मग आपणास राहण्यास घर मि व्याल अस समजायाच या सवधान पुढ गृहमेधीय इष्टि करायाची या पुढें क्रीड नीयष्टि करायाची त्यामध्य कीन हा अश मुख्य आहे "हे + वद्य, रथामध्य शोभणार, ज्याला शत्रु नाहीं, ज्यामध्यें मरुत एकत्र झाले आहेत जे क्रीडा क-रतात असे आमच सैन्य आह, चोहोंक-डून खूप त्याविषयीं गा ' जे धाव्यास रखे चपळ असून उड्या मारीत आहत, जे उत्साहान भरलेले आहेत अशा मनुष्यासारखे शोभत आहत जे वाड्या-मध्य असणाऱ्या मुलासारखे जे शोभ णाऱ्या वेगवानासारखे आणि खूप क्रीडा करणारे (अश्व) या प्रमाण डवडवलेले हे मरुत " हे दान मत्र ऋ० स (१ ३७ १ ) आणि ( ७ ५६ १६ ) या ठिकाणी आहेत या मत्रावरून क्रीड नीयेष्टीचा आकार आणि उद्देश वाच वाच्या सहज लक्षात येईल ही क्रीडनी येष्टि झाल्यानतर महाहवि नावाची इष्टि करतात या यज्ञामध्य महेंद्र देवता आहे, आणि विश्वकर्मदेवता आहे इंद्रालाच महान् असे विशेषण वेदामध्ये दिले आहे तोच वृत्र मारणारा असहि

(३—२)

ancient Âryas considered their dwellings to be secure whenever they succeeded in harassing, in weakening in defeating their enemies and in plundering them of all they possessed This characteristic of the system of warfare was often manifested The Santapaniyesti is followed by the Grihamedhiyesti. When they securely dwelt in their houses, they performed the Kridaniyesti the main characteristic of which is that they indulged in sports The following two texts (Rik Sanhitâ I 37 1 and VII 56,16) illustrate the spirit of these sacrifices Oh Kanvas, sing mightily on all sides of (the glory of) our army which engaged in sports which the gods Maruts have joined which has over-come all enemies and which is resplendent with war-chariots These winds are bubbling up with water (energy) mightily sporting and shining like a youth like children dwelling in a palace shining like breathless men prancing like brisk horses. The reader can easily perceive the nature of the Kridaniyesti from these verses This is followed by a sacrifice called Mahahavir isti the gods of which are Mahendra and Vishvakarman Mahendra is great Indra—he who killed Vritra How are Indra and Mahendra then distinct deities? How can one and the same god represent two gods because an epithet is given to him? According to the sacrificial system Indra and Mahendra are two distinct gods How is this? When the ancient Âryas dwelt on the banks of the Indus, and when different tribes

वर्णन आहे. मग इंद्र आणि महेंद्र हे भिन्न दोन देव कसे? एकाच देवास विशेषण लावल्याने तो दुसरा देव कसा होईल? यज्ञप्रक्रियेप्रमाणे म्हटले असता इंद्र हा देव महेंद्रापासून भिन्न आहे. हे कसे? जेव्हा प्राचीन आर्य सिंधु नदीच्या तीरी वास करू लागले तेव्हा निरनिराळ्या गोत्राचे लोक एकत्र होऊ लागले; आणि मिळून मिसळून यज्ञ करू लागले. त्या यज्ञाचे मुख्य तात्पर्य इतकेच की जी जी पूर्वी महत्कृत्ये त्यांनी केली होती त्यांचे स्मारक व्हावें एका एका गोत्रानी इंद्राचे स्तवन केले हें योग्यच आहे. परंतु तीच निरनिराळी गोत्रें मिळाली तेव्हा त्या सर्वांनी आपला देव महेंद्र मानला हे योग्यच आहे. परंतु एवढ्याने क्रीडा पूर्ण झाली असें नाही. सर्वांनी मिळून आपल्या वाडवडिलांची आठवण करावी हें योग्यच आहे यास ते महापितृयज्ञ म्हणत. या संबधी जे मंत्र येतात त्यांचे भाषांतर एणेप्रमाणे. "जे कनिष्ठ, मध्यम आणि उत्तम पितर ते आमच्यावर कृपा करणारे, ते येवोत. ते आमचा प्राण रक्षोत अहिंसक ते आमची रीति जाणणारे, आम्ही ज्या हाका मारतों त्या ऐकून ते आमचे रक्षण करोत. हे पवमान सोम, आमच्या पितरांनी तुझे साहाय्याने पराक्रम केले, ते आमचे पूर्वीचे पितर शूर होते, म्हणून आमची स्तोत्रे ऐकून घेऊन शत्रूंचा नाश करुन राक्षसरूप जे आमचे शत्रु त्यांचा नाश कर शूर जे घोडे त्यांसहवर्तमान, हे सोम, तू आम्हास धन दे. आमचे

began to fuse into one community, they performed sacrifices in a body These sacrifices, of course, commemorated the great deeds their ancestors had performed The tribes, when disunited, reasonably invoked their god Indra, and when united, they as reasonably characterized their god Indra as Mahendra. The commemoration of the deeds of their ancestors could not be reasonably complete unless they made collective oblations to their spirits This was called the Mahâpitri-yajna The following mantras illustrate the spirit of the Mahâpitri-yajna "May the spirits of the dead come They are ever gracious to us—those who are lowest, middling, and highest May they protect our lives May they defend us, listening to the invocations we make, harmless and conversant with our ways Oh purifying (Pavamâna), with thy aid our ancestors performed exploits, they were brave Destroy these enemical demons, after having listened to our invocations and destroyed our enemies Grant us wealth with brave horses, oh Soma, we have prepared these endearing oblations They are as plentiful as the ocean. They are fit for you Oh gracious spirits of the dead, we have invited you, come (then), listen to our praises, commend us, protect us, Oh Soma, we have known thee by our own intelligence, thou leadest us into a straight path, on account of thy excellent law, oh Soma, the spirits of our dead ancestors have obtained wealth among the gods Soma grants unto him, who makes him an oblation, a

निय हवि आम्ही सिद्ध केले आहेत ते निरतिशय पुष्कळ आहेत ते तुम्हास अर्पण करण्यास योग्य आहेत हे अनुग्रह करणारे पितर हो तुम्हास आम्ही आमंत्रण केले आहे, या तुम्ही आमचा स्वीकार करा आम्हास शांतता द्या आणि रक्षण करा हे सोम आम्ही आमच्या बुद्धीने तुला जाणला आहे तू अतिशय मार्गाने आम्हास पोहचवितोस तुझ्या उत्तम नेत्याच्या योगाने, हे इंद्रा तुझ्यामध्ये आमच्या शूर पितरांस धन प्राप्त झाले जो त्याला सोमाला (हवि अर्पण करतो) त्याला सोम धेनु देतो सोम चपळ घोडा देतो सोम पुत्र देतो, तो पुत्र कसा? लौकिक कामात गृहकर्म जाणणारा, यज्ञकर्म जाणणारा, सभाकर्म जाणणारा आणि बापाची कीर्ति वाढविणारा" हे सोम पितरांसह तू आमची गाठ घालणारा, तू स्वर्ग आणि पृथ्वी याचा विस्तार करणारा त्या तुला हे सोम आम्ही हवि अर्पण करतो आम्ही धनाचे पति व्हावे यज्ञकर्म करून स्वर्गास पोचणारे हे पितर हो, आम्हा अल्पज्ञांचे रक्षण करा आम्ही तुम्हाला जे हवि अर्पण केले आहेत ते घ्या या आणि उत्तम सुखें देऊन आमचे रक्षण करा नंतर सुख द्या ते असे की ज्यामध्ये दुःख नाही आणि पाप नाही मोठ्या उत्तम ज्ञानी पितर कळले आहेत व्यापकाचा (यज्ञाचा) विनाश नाही, आणि विशेष प्रवृत्ति आहे, असा आम्हास हा यज्ञ मिळाला आहे बर्हींच्या आसनावर बसणारे पितर या स्थळीं सर्व आले आहेत

cow a swift horse a son, versed in the ways of the world in the management of domestic affairs, in the performance of sacrifice, in the management of an assembly—a son who increases the fame of his father ' Oh Soma thou meetest us with our ancestors Thou expandest the earth and the heavens. Oh Soma unto thee we make these oblations May we be the lords of wealth Oh spirits of the dead having performed sacrifices, you dwell in heaven protect us these moderns accept the oblations we have offered unto you Come and protect us bestowing upon us the highest joys then grant (unto us) happiness such as is free from all sorrow and sin The most wise spirits of the dead are known to us We have obtained this sacrifice which is a special activity—(a sacrifice) all pervading ( and ) indestructible. The spirits of the dead sitting on the Barhi grass seats have all come, may they accept their portion of food of the Soma-juice of the Purodásha cake May our salutation be unto these spirits of the dead who dwell among our opulent brethren unto those who are engrossed in enjoyment those who have died after we were born, and those who died before our birth. Come here, oh the spirits of the dead, who were duly consumed by fire, and being pleased take your seats. Accept the offering we have placed upon the Barhi grass Grant unto us all wealth including sons and grandsons See *Rik sanhitâ* (X 15,11) There are the spirits of the dead who

पुरोडाशाचा, सोमाचा, अन्नाचा भाग घेवोत. जे पितर पूर्वी होऊन गेले, जे पितर आमच्या मागून होऊन गेले, जे पितर या पृथ्वीमध्ये राजसामध्ये गुतून गेले आहेत, आमचे श्रीमत असे जे बहुजन त्यामध्यें खास वास करीत आहेत, असे जे या स्थळी आज आले आहेत त्यास आमचा नमस्कार असो. अग्निष्वात्त नावाचे पितर हो, एथे या. आणि सुप्रसन्न होऊन आपआपल्या स्थानी बसा. बर्हिदर्भावर जे जे तुम्हास हवि दिले आहेत ते घ्या, आणि पुत्रपौत्रादि सर्वप्रकारें धन आम्हास द्या ऋ० स० (१०,१५,११.)

जे पितर एथे आहेत आणि जे एथे नाहीत, जे आम्हास विदित आहेत आणि जे आम्हास विदित नाहीत त्या तितक्यांना, हे अग्नि, तू जाणतोस. यज्ञसबधी द्रव्याच्या योगाने जो आम्ही चागला यज्ञ केला त्याचे तू सेवन कर. ऋ० स० (१०,१५,१३ ). ज्यावर अग्नीचा सस्कार झाला आहे, ज्यावर अग्नीचा संस्कार झाला नाही, जे द्युलोकामध्ये यज्ञद्रव्याचे योगेंकरून तृप्त होतात, हे दीप्यमान अग्ने, त्याच्या प्राणाला नेणारा तू आमच्या पितराच्या अतरात्म्याला यथायोग्य रीतीने व्याप. ऋ० स०(१०,१५,१४ ) अगिरस नामक पितराशी एक मत झालेला जो तू यम, तू या प्रस्तरावर येऊन बस. कवीनी उच्चारलेले जे मत्र ते मत्र तुला आणोत हे राजा या हवीच्या योगाने तुष्ट होऊन ( यजमानास) हर्ष कर ऋ०स० (१०,१४,४ ) हे यम, यज्ञात

are here and those, who are not here, those, whom we know and those, whom we do not know all these, Agni, thou knowest Accept the sacrifice which we have performed by means of sacrificial materials" See *R*ik-sanhitâ (X 15,13 ) "Those who are duly consumed by fire and those who are not duly consumed by fire, and who are satisfied in heaven by sacrificial oblations, oh resplendent Agni, thou conveyest their spirits, occupy duly the souls of our dead ancestors" See *R*ik-sanhitâ(X 15,14 ) "Come thou Yama and sit upon this seat of Darbha-grass Thou, who art of one mind with the dead Angirasa May the mantras which the poets have pronounced reach thee Oh king, gratify (the sacrificer), being satisfied with these oblations" See *R*ik-sanhitâ (X 14,4 ) "Oh Yama, come with Angirasa, who love a variety of Soma-songs and who are entitled to come to this sacrifice and gratify the sacrificer I invite to this sacrifice thy father, the sun sitting on this seat of Barhi-grass, (may he gratify the sacrificer)" See *R*ik-Sanhitâ(X 14,5 ) "Making these oblations, worship king Yama, to whom men go—son of the Sun—not coming in the way of many One, who takes to different regions the righteous after death" See *R*ik-sanhitâ(X 14,1 ) We have translated all these mantras connected with the Mahâpitri-yajna, that the reader may know how the ancient Âryas remembered their ancestors on such occasions The Châturmâsya series of sacrifices was not completed, when the Anîkavatesti,Sântapanîyesti, Gri-

क्रीडनीयेष्टि, महाहविरिष्टि, महापितृयज्ञ इतके केल्याने चातुर्मास्यसंबंधी कर्म समाप्त झाली असे नाही. प्रसिद्धि इष्टि म्हणून एक कर्म करायाचे असते, ती त्र्यंबकयाग या नावाचे कर्म केल्यानंतर करायाची. त्र्यंबक यागामध्ये जितकी घरांत मंडळी आहेत तितक्याहून अधिक एक इतके पुरोडाश करायाचे आणि ते एक कपालावरच भाजायाचे. जणो कासवाच्या आकाराचे तांदळाच्या पिठाचे गोळेच. प्रथम घरांतील गार्हपत्य अग्नीचे उपस्थान करून, त्यातले एक कोलित, पळसाची पाने, दर्भ, पाण्याचे भांडे ही बरोबर घेऊन चवाठ्यावर सर्व मंडळी जातात. मग तेथे रेघ मारून, त्यांत कोलित ठेऊन, अग्नि पेटवितात. त्यामध्ये पळसाच्या पानांत पुरोडाशाचे भाग घेऊन उभे राहूनच त्याच्या आहुति देतात. सरतेशेवटचे पळसाचे पान आपल्या बैऱ्याच्या गोठ्यांत किंवा उंदराच्या बिळात टाकतात. राहिलेले पुरोडाश साऱ्या मंडळीला एक एक असे वाटून देतात. यजमानास दोन पुरोडाश मिळतात, कारण एक पुरोडाश अधिक केलाच असतो. नंतर सर्व मंडळी उजव्या मांड्या थोपटित थोपटित चवाठ्यावरील अग्नीस प्रदक्षणा करतात. मग त्याच्या उत्तर बाजूस जातात आणि त्या स्थळी पुरोडाश झेलतात. आणि असे झेलित झेलित तीन प्रदक्षणा करून उत्तरेच्याच बाजूस उभे राहतात. चवाठ्याची जागा आहे, गावातील मंडळी सर्व जमली आहे, तरुण लोक लक्ष देऊन पहात आहेत, अग्नि

shas were distributed among the assembly, one to each. Two Purodâsha cakes were given to the sacrificer, because an additional Purodâsha had already been prepared. They then patted their laps, and thus went round the fire kindled upon the public place. Then they went to its north, then they tossed up their Purodâsha-cakes and caught them while falling, and thus going round the fire thrice, they stood to its north. It was a public place, where the villagers had come. The young men were intently looking on, in the middle the fire blazed, and to the north of the fire, the family of the sacrificer stood. On such an occasion and in the presence of their parents and of the assembled multitude, a girl repeated the following "I sacrifice unto Tryambaka, who is full of fragrance and who knows my husband. May I be released from this as a stem is separated from a cucumber and not from my husband." Then she patted her left lap and thrice went round the fire, tossing up and catching her Purodâsha. Then all the members of the family delivered into the hands of the sacrificer their Purodâsha-cakes. He handed them over to his wife, she, to her daughter, and her daughter, again to an Adhvaryu-priest, who ties them with a string and places them on a dry branch of a tree. The assembled multitude looked at him and worshipped the god. This is the Tryambaka-yâga. When they returned home and offered boiled rice to Aditi, the Prasiddhi-ishti was completed. This Prasiddhi-ishti is the form in

वच. आणि सागते वेळी शब्दामध्ये हि क्रम उत्पन्न होतो यापमाणे शब्दसबधी आणि अर्थसबधी असा दोन प्रकारचा क्रम आहे अर्थसबधी क्रम म्हटला म्हणजे त्यामध्ये मनाचे निरनिराळे व्यापार गुतले. अनुमान, व्यजना, प्रयत्न हे व्यापार मुख्य आहेत. म्हणून ज्या वाक्यामध्ये क्रम दाखविणारी पुढे, मागे, अशी पदे असतात त्यास श्रुतिक्रम असे म्हणतात. अर्थाच्या धोरणानें म्हणजे अनुमानादिकाच्या योगाने जो क्रम सिद्ध होतो त्यास अर्थक्रम असे म्हणतात. केवळ एकामागून एक विचार आल्यामुळेच त्यामध्ये जो सबध उत्पन्न होतो त्यास पाठक्रम म्हणतात. आठवणीच्या योगाने किंवा मनामध्यें व्यजना उत्पन्न होऊन जो क्रम सिद्ध होतो त्यास स्थानक्रम असे म्हणतात. अगीचा जो क्रम तोच अगाचा क्रम असे जेथे सिद्ध होते तेथे मुख्यक्रम कोठून तरी प्रारभ केलाच पाहिजे असे समजून अव्यवस्था होऊ नये म्हणून जेथून प्रारभ केला तोच क्रम ठेवायाचा याचे नाव प्रवृत्तिक्रम. असे क्रमाचे साहा प्रकार आहेत. त्याची लक्षणे काय, त्यांचा भेद काय, याचा विचार ह्या पादामध्ये झाला आहे यावरून वाचकाच्या असें लक्षात येईल की क्रमाचा आणि अध्यात्मविद्येचा मोठा सबध आहे. त्याचे स्वरूप काय, हें क्रमाच्या निरनिराळ्या जातीवरून लक्षात येईल. शब्द मागे पुढे करून किंवा विचार मागें पुढें करून क्रम बसवावा लागतो. ज्या मार्गाने हें करायाचे त्यास उत्कर्ष अपकर्ष

chapter From this the reader will perceive that there is a close connection between exegetics and psychology This statement is borne out by the examination of the different kinds of sequence enunciated Sometimes sequence is established by the transference of statements or acts backwards or forwards, this is done artificially by means of forward or backward transference called *Utkarsa* and *Apakarsa*, the nature of which is, therefore, examined in this chapter. In pointing out how *Utkarsa* or *Apakarsa* is to be effected, and how sequence is to be established, certain maxims are laid down—maxims which are so many exegetical Paribhâsas Between these Paribhâsas and grammatical Paribhâsas there is a close connection

Between the commentary of Patanjali on the sûtra of Pânini and exegetical disquisitions there are many points of resemblance, and to show this resemblance, an *independent examination* is necessary, and upon such an examination we will enter in the due course of our notes.

नृपातांत ज्या संबंधानें उत्कर्ष आणि
अपकर्ष यांचा विचार या पादांत झाला
आहे हे उत्कर्ष अपकर्ष याजविषयीं कसे
कम असावयाचे कसा या संबंधानें या पा
दांत विचार आले आहेत त्यांचा आणि
व्याकरणांतील परिभाषेचा संबंध आहे
पतंजलीचें महाभाष्य आणि पूर्वमी
मांसा यांचें परस्परांशीं पुष्कळ अशीं सा-
म्य आहे त्याचा पूर्णपणें विचार कर
ण्याकरितां स्वतंत्र विवेचन केलें पाहिजे
तें मतांतरांत पुढें करूं

सूत्राणि.

# अथ पंचमाऽध्यायस्य द्वितीयः पादः ॥

## वाजपेयपशूनां सर्वेषामेकदोपाकरणादिधर्माऽनुष्ठाना-ऽधिकरणम् ॥

(पदार्थाऽनुसमयन्यायः) ॥

**सन्निपाते प्रधानानामेकैकस्य गुणानां सर्वकर्म स्यात् ॥१॥ (पू०) ॥**

भावार्थः । प्रधानानां यागानामेकदा प्राप्तौ ये ये सस्कारा: करणीयास्ते सर्वे ऐकैकस्मिन् भवति । निरूढपशुवधे प्रकृतिसवधेन ये पशुसरकारा निरूपितास्ते सर्वे पशुसस्काराश्चोदकवाक्यबलाद् वाजपेये प्राप्नुवति । तत्र यथाऽश्वप्रतिग्रहेष्टौ सर्वे सस्कारा: प्रत्येक क्रियते तथा वाजपेयेऽपीति पूर्वपक्षकारो ब्रवीति । सूत्रदशस्तु निरूढपशुप्रकृतियागे सर्वे सस्कारा: पशौ क्रमेण क्रियंते । तत्रैकः पशुः । चोदकवाक्येन वाजपेये सप्तदशपशुषु ते सस्कारा योज्यंते । तेनैकैकपशौ सर्वे धर्मा: करणीया: ॥

अनुसधेयानि वेदवाक्यानि ॥

सप्तदश प्राजापत्यान् पशूनालभते । तै० ब्रा० (१.३,४,३.) ॥

# पाचव्या अध्यायाचा दुसरा पाद

## वाजपेय यज्ञामध्ये सर्व पशूवर प्रत्येक संस्कार एकदम करायाचा विचार

(पदार्थानुसमय न्याय)

१ पुष्कळ प्रधान याग एकदम करायाचे असता सांगध्ये हवींवर जे संस्कार करायाचे ते एक प्रकारावर सर्व (एकदम) असे करावेत (पू०)

१ पदार्थानुसमय आणि काण्डानुसमय असे संस्कार करण्याचे दोन प्रकार आहेत. हे यात दिल्याने हे सहज लक्षात येईल. पंचायतनाची पूजा करायाची आहे. पंचायतनामध्ये पाच देव असतात: सूर्य गणपति देवी शंकर आणि विष्णु. पूजा करताना सोळा उपचार करावे लागतात: आवाहन, आसन, पाद्य, अर्घ्य, आचमनीय, मधुपर्क, वस्त्र, यज्ञोपवीत, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, मंत्रपुष्प, प्रदक्षिणा, नमस्कार. सूर्याचेच हे सारे सोळा उपचार केले, त्याची पूजा आटोपली, मग गणपति घेतला त्याचे ही असे सोळा उपचार केले असा जो संस्कार करायाचा प्रकार त्यास काण्डानुसमय असे म्हणतात. प्रथम सूर्याचे, मग गणपतीचे,

# THE SECOND CHAPTER OF THE FIFTH ADHYAYA

## THE SUBJECT THAT ANIMALS ARE TO BE SACRIFICIALLY ACTED UPON—ALL AT ONCE IN THE VAJAPEYA SACRIFICE

(Padarthanusamaya-nyaya.)

1 When many principal sacrifices are to be performed, all the sacrificial operations ought to be performed at once upon each oblation (in turn) (Opponent's statement)

1 There are two ways of performing sacrificial operations. They are called *Padarthânusamaya* and *Kandânusamaya*. An illustration will explain their nature easily. The Brahmana worships five gods collectively called the *Panchâyatana*. The five gods are—images of the Sun, of Ganapati, of a goddess representing power in general, of Shiva and of Visnu. Systematic idol worship includes sixteen operations—invocation, offering a seat, offering water for washing feet, offering water with a perfume and flowers on the palm of the right hand, offering water to be sipped, offering a dish consisting of honey, curds and clarified butter, offering clothes, offering a sacred thread, perfumes, flowers, incense, a light, food and final offering of flowers with Vedic

सूत्राणि.

सर्वेषां वैकजातीयं कृतानुपूर्व्यत्वात् ॥ २ ॥ ( सि० ) ॥

भावार्थः । यत् पूर्वपक्षकारेणोक्त तन् न । सर्वेषामेकजातीयः संस्कारो भवति । तेनानुपूर्व्यं न विहन्यते । यत्र विजातीयाः संस्कारास्तत्र व्यवधानं प्राप्नोति । यत्रानुपूर्व्यं सिध्यति तत्र सर्वेषां धर्माणामेकदा न प्राप्तिः ॥

अनुसधेयानि वेदवाक्यानि ॥

वैश्वदेवी कृत्वा पशुभिः ( प्राजापत्यैः ) चरंति ॥

मग देवीचे, मग शकराचे, आणि मग विष्णूचे असे, एकामागून एक आवाहन केले पुढें तसेच एकामागून एक आसनादि दुसरे उपचार केले असा जो हा प्रकार यास पदार्थानुसमय म्हणतात. आहे काय ? वाजपेय सोमयज्ञामध्यें सतरा पशु मारायाचे असतात त्यावर निरनिराळे सस्कार करायाचे असतात. ते सस्कार असे उपाकरण म्हणजे पशूला आणायाचा, नियोजन म्हणजे त्यास बांधायाचा, इत्यादि सस्कार करायाचे ते पदार्थानुसमयानें करावेत किंवा काडानुसमयाने करावेत असा बौद्धाचार्यांमध्यें आणि वैदिकाचार्यांमध्ये वाद पडला वरील सूत्रात बौद्धाचार्य असे म्हणतात - वैदिकाचार्य, तुम्हास वाजपेय यज्ञामध्ये सतरा पशु मारायाचे आहेत. ठीक त्यामधील पहिला पशु घ्या त्यावर सर्व सस्कार करा मग दुसरा पशु घ्या असा काडानुसमय लावा का? हे पहा; सा-या सोमसस्थेची मूळप्रकृति निरूढपशुबध त्यामध्ये एका पशूवरच एकामागून एक

chaunts, going round the idol, and prostrations before it These sixteen offerings being made to the Sun, his worship is completed. Then Ganapati is taken up, sixteen offerings being made to him, his worship is also completed This way of worshipping these idols is characterized as Kândânu-samaya. Again, first the Sun is invoked, then the Ganapati, then the goddess, then Shiva and last Visnu. After the invocations are completed, seats are offered to each in turn Thus offerings, one after another, are made to all the gods This method of worshipping the gods is characterized as Padârthânu-samaya What is the application of this illustration? In the Vâja-peya-sacrifice sixteen animals are to be killed, and on them different operations are to be performed These operations are—formally bringing in a sacrificial animal (Upâkarana), tying it (Niyojana), and the rest The question now discussed by the Boud-dhâchârya and the Vaidikâchârya is whether these operations are to be performed according to the Padârthânu-samaya or Kândânu-

